**डॉ. मिना दिलीप कासारे, वैद्यकीय अधिकारी,**
**<u>गट-अ यांच्या स्वेच्छा सेवानिवृत्तीबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन आदेश क्रमांकः स्वेसेनि-२०१९/प्र.क्र.२५२/सेवा-३
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकुल इमारत, १० वा. मजला
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: २३ नोव्हेंबर, २०२०

**वाचा :-** सहसंचालक (प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/२ब/डॉ. कासारे /स्वेसेनि/जा. क्र. ४७९/१९, दि.०४/१०/२०१९.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, वैद्यकीय अधिकारी गट-अ या संवर्गातील (वेतनस्तर S-२० : ५६१००-१७७५००) या मध्ये कार्यरत असलेल्या डॉ. मिना दिलीप कासारे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, ग्रामीण रुग्णालय चिखली, जि. बुलढाणा यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस होऊन, सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय दि. १३.१२.१९९५ अन्वये नामनिर्देशनाने नियुक्ती झाली आहे. डॉ. कासारे, यांनी म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम क्र. ६६ (१) मधील तरतुदीनुसार २० वर्षाची अर्हताकारी सेवा दि.१२.१२.२०१५ रोजी पूर्ण केलेली असल्याने, तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (५) नुसार डॉ. कासारे यांनी स्वेच्छा सेवानिवृत्तीची नोटीस विहित कालावधीत मागे न घेतल्याने, म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (२) नुसार डॉ. कासारे ह्या आपोआपच स्वेच्छा सेवानिवृत्तीच्या नोटीशीच्या समाप्तीच्या दिनांकास स्वेच्छा सेवानिवृत्त ( Deemed to retire ) झाल्याचे मानले आहे. सबब, डॉ. कासारे यांनी दि.०२.०४.२०१९ च्या अर्जान्वये दिलेली स्वेच्छा सेवानिवृत्तीची सूचना स्विकारण्यात आली असून, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम क्रमांक ६६ (१) (२) (५) मधील तरतुदींनुसार डॉ. मिना दिलीप कासारे, वैद्यकिय अधिकारी, गट-अ, ह्या दि.०२.०७.२०१९ (म.पू.) पासून स्वेच्छेने सेवानिवृत्त झाल्या असल्याचे घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११२३१५४९४२७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMESH DHARMA RATHOD

Digitally signed by UMESH DHARMA RATHOD
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=9d2847c085fbb527b4b95e71ae1457bfffcbb1147b4cb9142
3f372da97117d29, postalCode=400001,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=3667a98f6d3e5f0ed5652697d674c2eb05d852dd34f8
7fda6a20696c80787981, ou=PUBLIC HEALTH DEPT, o=GOVERNMENT
OF MAHARASHTRA, cn=UMESH DHARMA RATHOD
Date: 2020.11.23 16:28:33 +05'30'

**( डॉ. उमेश ध. राठोड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

३) उपसंचालक, आरोग्य सेवा अकोला मंडळ, अकोला.
४) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय बुलढाणा.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखारीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
७) डॉ. मिना दिलीप कासारे, वैद्यकीय अधिकारी यांना (उपसंचालक, आरोग्य सेवा अकोला मंडळ, अकोला यांचे मार्फत)
८) निवडनस्ती सेवा-३.